सन २०१६-१७ साठी, कृषी उन्नती योजना - एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत. (अनुसूचित जनजाती उपयोजना).

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक.राफअ २०१६/प्र.क्र.१३७/९अे,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- १७ फेब्रुवारी, २०१७

वाचा :- १) केंद्र शासनाचे, कृषि,सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्रमांक एफ-नं.१८-९/२०१६-MIDH (NHM), दिनांक १८.०४.२०१६,
२) केंद्र शासनाचे, कृषि,सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्रमांक एफ-नं.३३-२/२०१६-MIDH (AAP), दिनांक ०३.०५.२०१६,
३) केंद्र शासनाचे, कृषि,सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्रमांक एफ-नं.१८-२९/२०१६-(NHM), दिनांक १८.०५.२०१६,
४) शासन निर्णय,कृषी व पदुम विभाग ,क्र.वानियो २०१५/प्र.क्र.५५/भाग-१/१५/२-अे, दि. १८.५.२०१६,
५) शासन निर्णय,कृषी व पदुम विभाग, क्र.एमआयडीएच २०१५/प्र.क्र.१३९/९-अे, दि. २/७/२०१६,
६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक: बीयुडी-२०१६/प्र.क्र.१३/कार्यासन.६, दि.०९.०२.२०१७.

**प्रस्तावना**

राज्यात सन २००५-०६ या आर्थिक वर्षापासून केंद्र पुरस्कृत, राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यात येत आहे. सन २०१४-१५ पासून सदर योजना एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान म्हणून राबविण्यात येत आहे. सन २०१६-१७ मध्ये, सदर अभियान केंद्र हिस्सा ६० % व राज्य हिस्सा ४०% या प्रमाणे राबविण्यास संदर्भाधीन क्र.४ येथिल शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये, कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान देशात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये, सदर अभियान सन २०१६-१७ मध्ये राज्यात राबविण्याकरीता रु. १४८.२९ कोटी रकमेच्या कार्यक्रमास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजना राज्यात राबविण्यासाठी संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने, संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये, केंद्र हिश्याचा पहिल्या हप्त्याचा खालीलप्रमाणे निधी राज्य शासनास उपलब्ध करून दिला आहे.

रु. लाखात

| सर्वसाधारण प्रवर्ग | अनुसूचित जाती प्रवर्ग | अनुसूचित जनजाती प्रवर्ग | एकुण |
|---|---|---|---|
| ३२७५.६४ | ४०४.४० | ३६३.९६ | ४०४४.०० |

सन २०१६-१७ मध्ये कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान अंतर्गत, अनुसूचित जनजाती प्रवर्गासाठी केंद्र हिश्याची रक्कम रु.८००.७३ लाख व राज्य हिश्याकरीता रक्कम रु.१ हजार पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र.३ येथिल पत्रान्वये, एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत, अनुसूचित जनजाती प्रवर्गाकरीता पहिल्या हप्त्याचा रु. ३६३.९६ लाख इतका निधी वितरित केलेला आहे. आदिवासी विकास विभागाने, केंद्र शासनाने वितरित केलेला पहिल्या हप्त्याचा निधी रु. ३६३.९६ लाख संदर्भाधिन क्रमांक ६ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभाग/ नियंत्रण अधिकारी म्हणून प्रधान सचिव (कृषी), मंत्रालय, मुंबई -३२ यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरित करण्यास मंजुरी प्रदान केली आहे. सदरचा पहिल्या हप्त्याचा निधी रु. ३६३.९६ लाख, एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत, अनुसूचित जनजाती प्रवर्गासाठी, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u>**

१. केंद्र शासनाच्या कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागाच्या दि.१८.०५.२०१६ च्या पत्रान्वये, एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत, अनुसूचित जनजाती उपयोजना प्रवर्गाकरीता वितरित केलेला पहिल्या हप्त्याचा रु.३६३.९६ लाख निधी, सन २०१६-१७ च्या मंजूर तरतूदीमधून एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत त्याच प्रयोजनासाठी, खर्च करण्यास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

१) मागणी क्रमांक टी-५
मुख्य लेखाशिर्ष-२४०१ - पीक संवर्धन,
००(७९६) - अनुसूचित जनजाती उपयोजना,
(०१) अनुसूचित जनजाती उपयोजनाअंतर्गत योजना)
(०१) (०६) कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान
(केंद्र हिस्सा ६० %) (अनुसूचित जनजाती उपयोजना)
(२४०१ A०२९)
३३ अर्थसहाय्य

३. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना संनियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या योजनेंतर्गत लाभ घेणा-या लाभार्थ्यांची निवड पारदर्शकपणे करण्यात यावी. लाभार्थ्यांची यादी संपूर्ण तपशीलासह कृषि विभागाच्या अधिकृत संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

५. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला आहे. संनियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी

खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दीष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त आदिवासी विकास, आदिवासी विकास विभाग तसेच कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावीत.

६. लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरून शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने बाहेरील क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवण्यात.

७. या शासन निर्णयाची काटेकोरपणे अमंलबजावणी होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करताना सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, अधिसूचना, आदेश, केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि भारताचे नियत्रंक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण आणि खर्चात अनियमतता होणार नाही यांचे पालन होईल या अटीच्या अधिन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८. प्रस्तुत आदेश, आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय, क्रमांक बीयुडी-२०१६ - २०१६/प्र.क्र.१३/का.६ , दि. ०९.०२. २०१७ ला अनुलक्षून व शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-३/ २०१६/प्र.क्र.८९ /अर्थ -३, दि.२०.०४.२०१६ मधील अटींची पुर्तता करण्याच्या अधीन राहून, तसेच शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक: पूरक-२०१६/प्र.क्र.२०१/अर्थ -३, दि.०४.०१.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारामध्ये, निर्गमित करण्यात येत आहेत.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१८१४३५४७७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Vitthal Vishe

Digitally signed by Anil Vitthal Vishe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=74ca9dc2061da0ad3bea01df9e4b7d481e5cbddd04fda84d597e4e31691e5e7f, cn=Anil Vitthal Vishe
Date: 2017.02.18 14:39:02 +05'30'

(अनिल वि.विशे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
३. मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य,विधानमंडळ सचिवालय,मुंबई-३२.
४. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२.
५. सचिव, (आदिवासी विकास ), मंत्रालय, मुंबई -३२.
६. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.

७. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
९. सर्व संचालक/ सर्व सहसंचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१०. सर्व विभागीय कृषी सहसंचालक.
११. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी.
१२. सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१७. संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती).
१८. सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३.
१९. लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
२०. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२१. निवड नस्ती.